विशेष व्याघ्र संरक्षण दलाच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्त्यांकरीता निधी

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.२३/प्र.क्र.१७८/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक :- ३० जुन, २०२३.

**वाचा :-**

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी-०६.२२/प्र.क्र.१८१/फ-१, दिनांक १५.०९.२०२२.
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-२२ (६)/योजना/प्र.क्र. १/५६४/२०२३-२४, दिनांक २६.०४.२०२३२.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय पर्यावरण, वन व हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे दिनांक १८.१२.२०१५ च्या पत्रान्वये “व्याघ्र प्रकल्प” या केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत अनावर्ती खर्चाच्या कार्यबाबींकरीता ६०:४० अशी हिस्सा पद्धती सूचित करण्यात आली. सुधारीत हिस्सा पध्दतीनुसार “व्याघ्र प्रकल्प” या केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत अनावर्ती खर्चाच्या कार्यबाबींकरीता ६०% केंद्र हिस्सा व त्यास अनुरुप ४० % राज्य हिस्सानुसार निधी वितरीत करणे अपेक्षित आहे. त्यामुळे विशेष व्याघ्र संरक्षण दलात कार्यरत असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना वेतनाचा ४० % भार (अनावर्ती बाब) उचलण्याची जबाबदारी ही राज्य शासनाची देखील आहे.

२. “व्याघ्र प्रकल्प” या केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत वार्षिक प्रवर्तन अहवालास (APO) केंद्र शासनाकडून मंजुरी मिळण्याकरीता लागणारा कालावधी लक्षात घेता सन २०२२-२३ करीता विशेष व्याघ्र संरक्षण दलात (STPF) कार्यरत असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांचे वेतनाकरीता रु. १४४१.९८ लक्ष निधी राज्य हिस्सा ४०% (२४०६-ए१०२) या लेखाशिर्षातील ०१-वेतन उद्दिष्ट शिर्षातून भागविण्यास नियोजन विभाग व वित्त विभागाच्या पूर्व परवानगीने संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली होती. तदनंतर सदर कर्मचाऱ्यांचे सन २०२२-२३ मधील प्रलंबित वेतन अदा करण्यासाठी आवश्यक असलेला रु. १३४३.२७ लक्ष निधी सन २०२३-२४ मध्ये राज्य हिस्सा ४०% २४०६ A१०२ या लेखाशिर्षांतील ०१-वेतन उद्दिष्ट शिर्षातर्गत उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांचे संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. त्यानुसार पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन विशेष व्याघ्र संरक्षण दलात (STPF) कार्यरत असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या सन २०२२-२३ मधील प्रलंबित वेतनाकरीता रु. १३४३.२७ लक्ष निधी सोबत जोडलेल्या सहपत्रान्वये राज्य हिस्सा ४०% (२४०६-ए१०२) या लेखाशिर्षातील ०१-वेतन उद्दिष्ट

शिर्षातर्गत सन २०२३-२४ करीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून खर्च करण्यास सदर शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

अ) व्याघ्र प्रकल्प या केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत विशेष व्याघ्र संरक्षण दलात (STPF) कार्यरत असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या सन २०२२-२३ मधील प्रलंबित वेतनाकरीता होणारा खर्च सन २०२३-२४ मध्ये लेखाशीर्ष क्रमांक लेखाशिर्ष क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(२१) व्याघ्र प्रकल्प (४० % राज्य हिस्सा) (२४०६ ए १०२) अंतर्गत ०१-वेतन या उद्दिष्टांतर्गत अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

आ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने व राज्य शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

इ) सदरच्या खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक असलेले लेखे व्यवस्थित/अचूक ठेवण्याबाबत दक्षता घ्यावी.

ई) वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे व क्रमांक :- अर्थसं-२०२३ /प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १४२/१४७५, दिनांक ०६.०६.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक :- २२५/व्यय-१०, दिनांक :- १४.०६.२०२३ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०३११४५४७९५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2023.07.03 11:47:05 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी,**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर.

५. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
६. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
७. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
८. उप वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
९. कक्ष अधिकारी (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर
११.फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

************

महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमाक :- डब्ल्यूएलपी-०५.२३/प्र.क्र.१७८/फ-१, दिनांक :- ३०.०६.२०२३ सोबतचे सहपत्र

(रु. लाखात)

| अ. क्र. | व्याघ्र प्रकल्प | रक्कम |
|---|---|---|
| १ | ताडोबा-अंधारी | ८७.३५ |
| २ | मेळघाट | ५५३.७८ |
| ३ | पेंच | २४३.२० |
| ४ | नवेगाव-नागझिरा | ४५८.८५ |
| | **एकूण** | **१३४३.२७** |

********